**सोलार पॉवर प्रोजेक्ट, साक्री या प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडून महानिर्मिती कंपनी मर्यादित यांना प्राप्त झालेल्या कर्जाच्या रु. २३.८५९० कोटी रकमेच्या समायोजनाबाबत- वित्तीय वर्ष २०२२-२३.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरमा-२०२२/प्र.क्र.१८/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२३

<u>संदर्भ</u> :- १) महालेखापाल कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. D.O. No. ACII/CAORB/CH-१/२०२२-२३/६६०, दि. १६/०२/२०२३.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.पुनर्वि २०२३/प्र.क्र.२४/ऊर्जा-३, दि.३०.०३.२०२३.

**प्रस्तावना** :-

ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखालील महानिर्मिती कंपनीकडून के.एफ.डब्ल्यू. जर्मन बँकेच्या सहकार्याने सौर प्रकल्प राबविण्यात येत असून सदर कर्जाची रक्कम रु.२३,८५,९०,०००/- केंद्र शासनामार्फत परस्पर भेल कंपनीस अदा करण्यात आली आहे. महालेखापाल कार्यालयाने दि.१६.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये पीव्ही ऊर्जा प्रकल्पांसाठी आरबीआय सीएएस नागपूरकडून प्राप्त झालेल्या रु. २३.८५९० कोटीच्या खर्चासाठी मुख्य लेखाशिर्ष "८६५८-११० CAORB सस्पेन्स" अंतर्गत थकबाकी दर्शविण्यात आल्याचे कळविले आहे. सदर खर्चाच्या थकबाकीची रक्कम केंद्र सहाय्यित कर्ज/ अनुदान, इ. स्वरुपात थेट या विभागाच्या अंतर्गत अंमलबजावणी करणाऱ्या संस्थांना दिली जात असून ही रक्कम संबंधित लेखाशिर्षांच्या अंतर्गत खर्चासाठी पुस्तकी समायोजनेद्वारे दर्शविणे आवश्यक असल्याचे महालेखापाल कार्यालयाने कळविले आहे. यानुषंगाने आता त्याच मागणी क्रमांकाखालील अन्य लेखाशिर्षाखालील बचतीच्या रकमेतून संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये सदर रक्कम पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर रक्कम योग्य त्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यासाठी पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय**-:

सोलार पॉवर प्रोजेक्ट, साक्री प्रकल्प, के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडुन रक्कम रु. २३,८५,९०,०००/- (रु. तेवीस कोटी पंच्याऐंशी लाख नव्वद हजार फक्त) आस्थापित करणाऱ्या कंपनीस थेट प्राप्त झाली आहे. तरी सदर रक्कम पुस्तकी समयोजनाने वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "क्रमांक के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्ज, (००)(००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यु. जर्मन बँकेकडुन महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे (कार्यक्रम) (६८०१०६६५), ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून समायोजित करण्यात यावा.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात रु. २३,८५,९०,०००/- इतक्या रक्कमचे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९९/२०२३/व्यय-१६, दिनांक २९.०३.२०२३ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३३११४२५२५७०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.04.17 12:35:43 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत:-**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, (अराप / रालेवि-१), मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७. निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
८. अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९. विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०. क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११. वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१२. मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.